**कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या पदस्थापनेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११४/(५४१/२०१४)/आ (वर्ग-१)**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१.

**तारीख: १५ जानेवारी, २०१५**

**वाचा:- जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एलटीएस-१११४/(३४७/२०१४)/आ.(वर्ग-१)...(२), दि.०६.०९.२०१४.**

**शासन आदेश :-**

श्री.श.नि.तायडे, कार्यकारी अभियंता, खडकपूर्णा प्रकल्प विभाग, देऊळगांव राजा, जि.बुलढाणा यांची संदर्भीय आदेशान्वये **कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, वाशिम** या पदावर बदलीने नियुक्ती देण्यात आली होती.

२. आता, प्रशासकीय सोईच्या दृष्टीने सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने, श्री.श.नि.तायडे यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांची सुधारित पदस्थापना बदली अधिनियमातील कलम ४(४) व ४(५) नुसार **कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, अमरावती** या रिक्त पदी (विनंतीनुसार) करण्यात येत आहे.

३. संबंधीत अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

४. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम

१९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०११५१५३४२८९८२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sachin Shamkant Desai

Digitally signed by Sachin Shamkant Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sachin Shamkant Desai
Date: 2015.01.15 16:34:21 +05'30'

**(स.शा.देसाई)**
शासनाचे कार्यासन अधिकारी

प्रत,

१) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
४) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
५) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
८) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), २-नागपूर.
९) खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
१०) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
११) संबंधीत अधिकारी.
१२) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३/गोपनीय शाखा/जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.